"अष्टविनायक गणपती मंदिरांचा जीर्णोध्दार करणे विकास आराखडयास" सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.८३/का.१४४४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २८ मे , २०२५.

**वाचा :** १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का.१४४४, दिनांक ०४ जून, २०१५.
२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का. १४४४, दिनांक १९ जुलै, २०१६.
३) नियोजन विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक : तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का.१४४४, दिनांक ०२ फेब्रुवारी, २०२२.
४) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.८३/का.१४४४-अ, दिनांक १० ऑक्टोबर, २०२४.
५) जिल्हाधिकारी, पुणे यांचे क्रमांक : जिनिस/नि-५/अष्टविनायक/आराखडा/२०२४/१७३०, दि.०३ जुलै, २०२४
६) विभागीय आयुक्त, पुणे यांचे क्रमांक : तीक्षेवि/प्र.क्र.२४-२२/अष्टविनायक आराखडा २/१९२/२०२४, दि.२४.०७.२०२४ रोजीचे पत्र.
७) विभागीय आयुक्त, पुणे यांचे क्रमांक : तीक्षेवि/प्र.क्र.२४-२२/अष्टवि.२/इ पत्र ५२/३९/२०२५, दि.१८.०२.२०२५ रोजीचे पत्र.
८) मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दि.१८.०३.२०२५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
९) मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील मंत्रीपरिषदेच्या दि.०६.०५.२०२५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:**

नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.८३/का.१४४४-अ, दिनांक १० ऑक्टोबर, २०२४ अन्वये रु.९२.१९ कोटी किंमतीच्या "अष्टविनायक गणपती मंदिरांचा जीर्णोध्दार करणे विकास आराखडयास" प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

०२. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का.१४४४, दि.०४.०६.२०१५ अन्वये राज्यातील तीर्थक्षेत्र, पर्यटनस्थळ परिसर विकास आराखडा अंतिम करणे व अंमलबजावणीसाठी धोरण / मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्यात आली आहेत. तसेच

दि.१९.०७.२०१६ च्या शासन निर्णयान्वये यातील काही तरतूदी/निकष याबाबत स्पष्टीकरणात्मक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

०३. उपरोक्त शासन निर्णयातील तरतूदीनुसार अर्थसंकल्पीय भाषणात नमूद आंतराष्ट्रीय/ राष्ट्रीय दर्जाची महत्वाची स्थळे, तीर्थक्षेत्रे परिसर विकास आराखडे यांची व्याप्ती व स्वरूप लक्षात घेऊन, संबंधित आराखडे नियोजन विभागामार्फत राबविण्यात येतात. स्थानिक पातळीवरील सर्व संबंधितांशी चर्चा करून विकास आराखडा व त्यास लागणारा निधी याचा आराखडा जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय कार्यकारी समितीने तयार करून तो मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीस सादर करण्यात येतो. उच्चाधिकार समिती विकास आराखड्यास मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील शिखर समितीची मान्यता प्राप्त करून घेण्यासाठी शिफारस करते.

०४. नमूद करण्यात येते की, रुपये ९२.१९ कोटींचा आराखडा हा सन २०२१-२२ च्या दरसूचीवर आधारित होता. सबब, वाचा क्र.५ येथील जिल्हाधिकारी, पुणे यांच्या दि.०३.०७.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सन २०२३-२४ च्या दरसूचीवर आधारित रुपये १४७.७१ कोटींचा प्रस्ताव सादर करण्यात आला होता. दरम्यान रुपये ९२.१९ कोटींच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने कार्यवाही सुरू होऊन मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील शिखर समितीची चक्राकार पध्दतीने मान्यता घेण्यास्तव दिनांक ०१.०७.२०२४ च्या टिप्पणीन्वये सदर प्रस्ताव सादर करण्यात आला होता. तद्नंतर विभागीय आयुक्त, पुणे यांच्या वाचा क्र.६ येथील दि.२४.०७.२०२४ रोजीच्या पत्रान्वये रुपये १४७.७१ कोटींचा प्रस्ताव प्राप्त झाला होता. तथापि, त्यामधील त्रुटींचे निराकरण करुन वाचा क्र.७ येथील पत्रान्वये पुन्हा रुपये १४७.८१ कोटींचा सुधारित प्रस्ताव सादर करण्यात आला. सदर प्रस्तावास मान्यता देण्याच्या अनुषंगाने नियोजन विभाग, शासन निर्णय दि.०४.०६.२०१५ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीची दि.१८.०३.२०२५ रोजी बैठक संपन्न झाली. सदर बैठकीत **रुपये १४७.८१ कोटी** किंमतीच्या सुधारित आराखडयास मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील शिखर समिती समोर मान्यतेस्तव ठेवण्याची शिफारस करण्यात आली.

०५. नियोजन विभाग, शासन निर्णय दि.०४.०६.२०१५ अन्वये तीर्थक्षेत्र / पर्यटनस्थळ विकास आराखड्यास मान्यता देणेकरिता मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील स्थापन करण्यात

आलेल्या “शिखर समिती” समोर सदर प्रस्ताव अंतिम निर्णयार्थ सादर करणे आवश्यक असते. तथापि, मुख्य सचिव कार्यालयाच्या दि. २९.०४.२०२५ च्या पत्रान्वये प्राप्त झालेल्या निर्देशास अनुसरुन शिखर समिती ऐवजी दि.०६.०५.२०२५ रोजी चौंडी, तालुका जामखेड, जिल्हा अहिल्यानगर येथे संपन्न झालेल्या मंत्रीपरिषदेच्या बैठकीत सदर आराखड्याचा प्रस्ताव मान्यतेसाठी सादर करण्यात आला. सदर बैठकीत “अष्टविनायक गणपती मंदिरांचा जीर्णोध्दार करणे विकास आराखडयाच्या” प्रस्तावित **रु.१४७.८१ कोटी** किंमतीच्या विकास आराखड्यास मान्यता देण्यात आल्याने सदर आराखडयास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

“अष्टविनायक गणपती मंदिरांचा जीर्णोध्दार करणे विकास आराखडयाच्या” प्रस्तावित **रु.१४७.८१ कोटी** किंमतीच्या विकास आराखड्यास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. रुपये १४७.८१ कोटीच्या कामांचा तपशील पुढीलप्रमाणे :-

(रक्कम रुपयात)

| अष्टविनायक गणपती मंदिराचा जीर्णोध्दार करण्यासाठी विकास आराखडा | | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **नाव** | **सुधारित किंमत** |
| १ | २ | ३ |
| I | **पुणे जिल्हा** | |
| | १. जतन, संवर्धन व परिसर व्यवस्थापन मयुरेश्वर मंदिर, मोरगाव | ८,२१,२३,७२६.०० |
| | २. जतन, संवर्धन व परिसर व्यवस्थापन चिंतामणी मंदिर, थेऊर | ७,२१,६४,५७१.०० |
| | ३. जतन, संवर्धन व परिसर व्यवस्थापन ओझर मंदिर | ७,८३,९७,३२७.८७ |
| | ४. जतन, संवर्धन व परिसर व्यवस्थापन रांजणगाव मंदिर | १२,१३,८२,४३६.२२ |
| | | |
| II | **रायगड जिल्हा** | |
| | ५. जतन, संवर्धन व परिसर व्यवस्थापन वरदविनायक मंदिर, महड | २८,२४,६३,९३५.५९ |
| | ६. जतन, संवर्धन व परिसर व्यवस्थापन बल्लाळेश्वर मंदिर, पाली | २६,९०,०२,७९२.१० |
| | | |
| III | **अहिल्यानगर जिल्हा** | |
| | ७. जतन, संवर्धन व परिसर व्यवस्थापन सिध्दटेक मंदिर | ९,९७,५८,७२९.०० |
| | **एकूण ( I + II + III )** | **१००,५२,९३,५१७.७८** |
| | | |
| IV | **इतर अनुषंगिक खर्च** | |
| | विद्युतीकरण व रोषणाई १० % | १०,०५,२९,३५१.७८ |
| | खर्चातील वाढ १० % | १०,०५,२९,३५१.७८ |

| | | |
|---|---|---|
| | आकस्मिक खर्च ४ % | ४,०२,११,७४०.७१ |
| | चाचणी व गुणवत्ता नियंत्रण शुल्क १ % | १,००,५२,९३५.१८ |
| | कामगार विमा ०.५ % | ५०,२६,४६७.५९ |
| | वस्तू व सेवा कर ( GST ) १८ % | १८,०९,५२,८३३.२० |
| | वास्तूविशारद शुल्क ३ % | ३,०१,५८,८०५.५३ |
| | वास्तूविशारद शुल्कावरील GST १८ % | ५४,२८,५८५.०० |
| | **एकूण इतर अनुषंगिक खर्च ( IV )** | **४७,२८,९०,०७०.७६** |
| | **एकूण एकंदर ( I + II + III + IV )** | **१४७,८१,८३,५८८.५४** |

०३. उपरोक्त कामांबाबत सर्व तरतूदी नियोजन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.८३/का.१४४४-अ, दिनांक १० ऑक्टोबर, २०२४ मधील मूळ आराखड्याच्या शासन निर्णयाप्रमाणे लागू राहतील.

०४. या आराखडयातील खर्च "मागणी क्र.ओ-१०, मुख्य लेखाशीर्ष ५४५२, पर्यटनावरील भांडवली खर्च, ०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा,१०१-पर्यटन केंद्र, (००) , (००) (१५) तीर्थक्षेत्र व पर्यटनस्थळ विकास आराखडा (कार्यक्रम/दत्तमत) (५४५२ ०२११) या लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५२८१५३९३६४११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2025.05.28 15:40:20 +05'30'

**(मिलिंद कुळकर्णी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
जिल्हाधिकारी, पुणे/रायगड/अहिल्यानगर.

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. मंत्री यांचे खाजगी सचिव ( सर्व )

६. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७. मा. संसद सदस्य /विधानसभा/ विधान परिषद सदस्य, (सर्व)
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
९. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, (सर्व)
१०. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई,
११. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर,
१२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पर्यटन महामंडळ, मुंबई.
१३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४. महाव्यवस्थापक, मध्य रेल्वे, मुंबई.
१५. विभागीय आयुक्त, कोकण/नाशिक.
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे/रायगड/अहिल्यानगर.
१७. पोलीस आयुक्त/अधिक्षक, पुणे/रायगड/अहिल्यानगर.
१८. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, मुंबई.
१९. विशेष कार्य अधिकारी, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे/कोकण/नाशिक
२०. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे/कोकण/नाशिक
२१. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे/रायगड/अहिल्यानगर
२२. जिल्हा नियोजन अधिकारी, पुणे/रायगड/अहिल्यानगर
२३. निवड नस्ती (का.१४४४-अ), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.